**देर्डे चांदवड देर्डे को-हाळे पाणी पुरवठा योजना, ता. कोपरगांव जि. अहमदनगर या पुर्नसुधारित योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु २०१४/ प्र.क्र. १४५ / पा.पु.०९**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२**
तारीख : १६ जून, २०१५

वाचा:-

१) शासन पत्र क्रमांकः बैठक २०१३/ प्र.क्र.०९/पा.पु.०६ दि. २८ जून २०१३

२) अधिक्षक अभियंता, म.जी.प्रा, ना व ग्रा यो नाशिक यांचे पत्र क्र. म.जी.प्रा / नावग्रायोमंना/तांशा/ ९४९/२०१३ दि. ५.४.२०१३

प्रस्तावना:-

देर्डे चांदवड देर्डे को-हाळे पाणी पुरवठा योजना, ता. कोपरगांव जि. अहमदनगर या पाणी पुरवठा योजनेच्या रु. २७८.९० लक्ष ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास शासन निर्णय दि.३ मार्च २०११ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान केली होती. तथापि, काही अपरिहार्य कारणांमुळे योजनेच्या खर्चात रु. ११५.७० लाखाने वाढ झाली आहे. सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या राज्य स्तरावरील छोटया गटाच्या दि. २८.६.२०१३ रोजीच्या बैठकीत शिफारस केल्यानुसार देर्डे चांदवड देर्डे को-हाळे पाणी पुरवठा योजना, ता. कोपरगांव, जि. अहमदनगर या पुर्नसुधारित पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

वरील बाब विचारात घेता देर्डे चांदवड देर्डे को-हाळे पाणी पुरवठा योजना, ता. कोपरगांव जि. अहमदनगर या पुर्नसुधारित पाणी पुरवठा योजनेच्या रु.११५.७० लाख (रुपये एक कोटी पंधरा लाख सत्तर हजार फक्त) या वाढीव खर्चासह रु. ३९४.६० लाख (रुपये तीन कोटी चौ-याण्णव लाख साठ हजार फक्त) इतक्या पुर्नसुधारित किंमतीस प्रशासकीय मान्यता देणेबाबत नियोजन व वित्त विभागास प्रस्ताविण्यात आले होते. तथापि वित्त विभागाने योजनेच्या वाढीव रक्कमेवर पुन्हा ९ % ईटीपी चार्जेस देणे संयुक्तिक होत नाही. सबब, सुधारित प्रशासकीय रक्कम रु. २७८.९० लक्ष + वाढीव रक्कम रु. १०६.१४ लक्ष मिळून एकूण ३८५.०४ लक्ष किंमतीच्या योजनेस मंजूरी प्रदान केली आहे. त्यानुसार देर्डे चांदवड देर्डे को-हाळे पाणी पुरवठा योजनेच्या रु. ३८५.०४/- लाख (रु. तीन कोटी पंच्याऐंशी लाख चार हजार फक्त ) इतक्या पुर्नसुधारित किंमतीस पुढील अटीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. ही योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत कार्यान्वित करण्यात येईल.

२. या योजनेच्या मूळ प्रशासकीय मंजुरी दिलेल्या निर्णयात ज्या सूचना दिलेल्या आहेत, त्याचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच मूळ शासन निर्णयात ज्या अटी व शर्ती दिल्या आहेत त्या कायम राहणार असून त्याचेही पालन करण्यांत यावे.

३ सदर योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधीत ग्रामपंचायत/ जिल्हा परिषदेच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधीत कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना विभाग यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यासंबंधी संबंधीत ग्रामपंचायत / जिल्हापरिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हापरिषद व संबधित ग्रामपंचायतीच्या अधिका-यांनी संयुक्तपणे पहाणी आयोजित करावी आणि अशा पहाणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. सदर योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) यावर दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी किंवा घसारा किंवा यंत्रसामुग्री नवी करण्याच्या निधीसाठी किंवा योजनांच्या खर्चातील लाभ घेण्याचा हिस्सा सोसण्यासाठी येईल त्या खर्चाच्या व्यवस्थेसाठी जिल्हा परिषदेस किंवा ग्रामपंचायतीस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही. महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी नियम, १९६० मधील तरतुदींनुसार आकारण्यात येणा-या पाणीपट्टीच्या आधारे योजना स्वावलंबी ठरेल हे पाहण्याची जबाबदारी संबंधित ग्रामपंचायतीची / जिल्हा परिषदेची राहील.

सदर योजना आर्थिकदुष्टया सक्षम राहण्यासाठी पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वेळोवेळी वाढ करण्यात यावी. त्या अनुषंगाने या योजनेकरीता पाणीपट्टी ग्रामपंचायत आकारेल. ग्रामपंचायतीने तशा आशयाचा ठराव केल्याशिवाय योजनेची उर्वरीत कामे हाती घेवू नयेत.

५. सन २०13 मधील C A G च्या अहवालानुसार राज्यातील २१ % पाणी पुरवठा योजना या देखभाल अभावी विज देयके न भरल्यामुळे (Poor maintenance /non payment of electricity bills ) बंद पडल्या असल्याचे दिसून येते. त्यामुळे सदर योजना आर्थिकदृष्टया सक्षम राहण्यासाठी पाणीपट्टी दरामध्ये आवश्यकतेनुसार वेळोवेळी वाढ करण्यात यावी.

६. योजनेची चाचणी घेतल्यानंतर योजना संबंधित ग्रामपंचायतीकडे हस्तांतरीत करुन तिचे लेखे बंद करण्यात यावे.

७. सदर योजनेची सर्व कामे सुधारित अंदाजपत्रकाच्या मर्यादेत १२ महिन्यात पूर्ण करण्यात यावीत. याकरीता महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने त्यांचेकडील संबंधित अभियंत्याकडे (नाव व पदनामासह) जबाबदारी सोपविण्यात यावी.

८. यानंतर योजना पुन्हा पुर्नसुधारीत करण्यात येणार नाही याची जबाबदारी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची राहील.रु. ३८५.०४ लाख या पुर्नसुधारित किंमतीमध्येच सर्व कामे पूर्ण करावीत.

९. या योजनेवर होणारा खर्च राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत उपलब्ध होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

१०. हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्र. ३१/का १४४३ दि. २/२/२०१५ व ८१/व्यय-३ दि.३/५ /२०१५ अन्वये प्राप्त त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६१६१४४३४०३२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vaishali Dattatraya Fulsundar

Digitally signed by Vaishali Dattatraya Fulsundar
DN: CN = Vaishali Dattatraya Fulsundar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Section Officer
Date: 2015.06.16 14:50:00 +05'30'

**वै.द.फुलसुंदर**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री ( पा पु व स्व ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) सर्व मा. विधानसभा / विधान परिषद सदस्य.
३) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
५) विभागीय आयुक्त, नाशिक.
६) जिल्हाधिकारी, अहमदनगर
७) संचालक, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा, पी.एम.टी. बिल्डींग स्वारगेट, पुणे
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर
९) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १/२ मुंबई / नागपूर
१०) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना, नाशिक
११) संचालक, पाणी व स्वच्छता स्हाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई
१२) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
१३) अधिक्षक अभियंता, भारत निर्माण कक्ष,समन्वय व सनियंत्रण कक्ष, नाशिक
१४) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना मंडळ, अहमदनगर
१५) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना विभाग, अहमदनगर
१६) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, अहमदनगर
१७) जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल व सर्वेक्षण व विकास यंत्रणा, अहमदनगर
१८) वित्त विभाग ( व्यय ३ ) / नियोजन विभाग,( कार्यासन १४४३ )मंत्रालय, मुंबई.
१९) मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, यांचे स्वीय सहाय्यक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
२०) कार्यासन क्रमांक पापु-०४,०६,१०,१३,१७,१८, २० व संगणक कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
२१) निवड नस्ती कार्यासन पापु-०९